**स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजने अंतर्गत**
**स्थापित महिला स्वयंसहायता गटास देण्यात**
**येणा-या कर्जाच्या व्याजासाठी अनुदान.**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन निर्णय क्रं.स्वग्रायो-२०११/प्र.क्र.२५/योजना-३,
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २२ मार्च, २०११

वाचा:- (१) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.स्वग्रावि-२००८/प्र.क्र.१००२/योजना-३, दिनांक- ५ फेब्रुवारी, २००९,
(२) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.अर्थसं-२००९/प्र.क्र.७७२/योजना-१, दिनांक- ३० मार्च, २००९.
(३) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रं.स्वग्रायो-२०११/प्र.क्र.२५/योजना-३, दिनांक - २३ फेब्रुवारी, २०११

**शासन निर्णय-**

शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक : स्वग्रावि-२००८/प्र.क्र.१००२/ योजना-३, दिनांक ५ फेब्रुवारी, २००९ अन्वये स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजनेअंतर्गत दारिद्र्य रेषेखालील महिलांच्या स्थापित, नियमित कर्ज फेड करणा-या गटास व्याज दरावरील ४% व्याजदर वगळता उर्वरित ७% पर्यंतच्या व्याजदरासाठी अनुदान देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

२. वरील निर्णयाच्या अनुषंगाने सन २००८-०९ या आर्थिक वर्षात नियमितपणे कर्जफेड पूर्ण करणा-या स्वर्णजयंती ग्रामस्वरोजगार योजनेअंतर्गत दारिद्र्य रेषेखालील स्थापित महिलांच्या स्वयंसहायता गटास अनुदान देण्यासाठी शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र. अर्थसं २००९/प्र.क्र.७७२/योजना-१, दि.३० मार्च, २००९ अन्वये एकूण रु.१०००.००लक्ष (रुपये एक हजार लक्ष फक्त) व सन २०१०-११ मध्ये एकूण रु.१०३.४० लाख (रु.एक कोटी तीन लाख चाळीस हजार फक्त) इतके अनुदान जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना वितरीत करण्यात आले आहे.

३. त्यात सन २०१०-११ या वर्षात उपरोक्त अ.क्र.३ येथील आदेशान्वये जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणां, भंडारा यांना व्याजदरावर अनुदान देण्यासाठी एकूण रु.२०.०० लाख (रुपये वीस लाख फक्त) इतके अनुदान देण्यात आले आहे. आता, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, भंडारा, यांनी पुन्हा मागणी केल्यानुसार एकूण रु.२.०२ लाख (रुपये दोन लाख दोन हजार फक्त) इतके अनुदान दिनांक २२ मार्च, २०११ रोजी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यात आले आहेत.

४. सदरची रक्कम मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, भंडारा यांचेकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सुपूर्द करण्यात येत आहे. सदर रक्कम जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, भंडारा यांना अदा करण्याचे अधिकार मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, भंडारा यांना प्रदान करण्यात येत असून त्यानुसार त्यांनी जिल्हा ग्रामीण विकास यंत्रण, भंडारा, यांना सदर निधी प्रदान करण्याची कार्यवाही करावी.

५. सदर खर्च ग्रामविकास व जलसंधारण विभाग मागणी क्रमांक एल ३ **"२५०१ - ग्रामीण विकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६ स्वयंरोजगार कार्यक्रम, १०१ स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजना, (०१)(०३) ग्रामस्तर व जिल्हास्तरावर सेवासंघ स्थापना व महिला बचतगटांना व्याजदरात अनुदान देणे (२५०१ १९८ ४)** ३३ अर्थसहाय्य या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

कृ.मा.प.

६.	हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेले आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे अन्यथा ही वित्तीय अनियमितता समजण्यात येईल याची नोंद घ्यावी.

७.	या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, भंडारा, यांनी पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी, कार्यासन योजना-२, ग्रामविकास व जलसंधारण विभाग यांचेकडे पाठवावी :- (१) मंजूर केलेली रक्कम, (२) कोषागारातून काढलेली रक्कम, (३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक.

८.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www. maharashtra.gov.in वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०११०३२२१६३२१७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( रा. शं. नागरे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई (पांच जादा प्रतींसह)
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२,नागपूर ( पांच जादा प्रतींसह)
३. विभागीय आयुक्त व त्यांच्या कार्यालयातील उपायुक्त(विकास शाखा), नागपूर,
४. जिल्हाधिकारी, भंडारा,
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद , भंडारा,
६. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, भंडारा,
७. जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा,
८. नियोजन विभाग ( का. १४४१) मंत्रालय मुंबई-३२.
९. वित्त विभाग (व्यय-१५) व ( अर्थ-१७) मंत्रालय मुंबई-३२.
१०. अप्पर संचालक, प्रकल्प आखणी व एकात्मीक ग्रामीण विकास कार्यक्रम कक्ष ( पांच प्रतींसह)
११. कार्यासन अधिकारी, कार्यासन वित्त-१, योजना-१, योजना-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
१२. निवड नस्ती, कार्यासन योजना-३, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.